# हरवलेला व्हेल – हंप्री

## एक खरी गोष्ट



वेंडी टोकुडा और रिचर्ड हॉल

चित्र: हनाको वाकियामा

मराठी: अश्विनी बर्वे


SHAG SLOUGH
SACRAMENTO RIVER
SUISUN BAY
BENICIA
VALLEJO
MARTINEZ
NOVATO
SAN PABLO BAY
RICHMOND
RICHMOND-SAN RAFAEL BRIDGE
SAN RAFAEL
BERKELEY
MILL VALLEY
OAKLAND
SAUSALITO
BAY BRIDGE
GOLDEN GATE BRIDGE
SAN FRANCISCO
SAN LEANDRO
SAN BRUNO
SAN FRANCISCO BAY
HAYWARD
SAN MATEO BRIDGE
PACIFICA
FREMONT
BURLING
SAN MATEO
FARALLON ISLANDS
PACIFIC OCEAN
DUMBARTON BRIDGE
REDWOOD CITY
SAN JOSE
HALF MOON

# हरवलेला व्हेल – हंप्री

## एक सत्य कहाणी

वेंडी टोकुडा और रिचर्ड हॉल

चित्र: हनाको वाकियामा

मराठी: अश्विनी बर्वे





आपली गोष्ट समुद्रातल्या एका उन्हाळी दिवसापासून सुरू होते. हिवाळा येण्यापूर्वी दक्षिणेकडे प्रवास करणाऱ्या हंपबॅक व्हेलचा एक घोळका प्रवास करत होता. हंपबॅक व्हेल हे भव्य प्राणी आहेत जे पाण्याखाली एकमेकांसाठी सुंदर गाणी गातात. आता जगात फारच कमी हंपबॅक व्हेल शिल्लक आहेत, त्यामुळे त्यातील प्रत्येकजण अतिशय खास आहे.

आणि हंपबॅक व्हेल बुद्धिमान असतात. प्रत्येक हिवाळ्यात ते दक्षिणेकडे प्रवास करतात, प्रत्येक उन्हाळ्यात ते उत्तरेकडे जातात आणि त्यांना नेहमीच त्यांचा रस्ता माहित असतो.



पण व्हेलपण चुका करू शकतात. हंप्री नावाच्या एका व्हेलने एक मोठी चूक केली. त्याची आपल्या मित्रांपासून ताटातूट झाली आणि गोल्डन गेट पुलाखालून सॅन फ्रांसिस्को खाड़ीत तो रस्ता चुकला.

हंप्रीला खाडीत पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटले! हंपबॅक व्हेल सहसा खूप खोल पाण्यात राहत असल्यामुळे लोकांना खूप वेळा बघायला मिळत नाही. सॅन फ्रान्सिस्को शहराच्या इतक्या जवळ हंपबॅक व्हेल पाहणे हा खरोखरच खास अनुभव होता. हंप्री पाहणे एक विहंगम दृश्य होते –तो शहराच्या बसइतकी लांब आणि सात हत्तींइतकी मोठा होता. जेव्हा तो श्वास घेण्यासाठी वर आला तेव्हा लोकांना ते दृश्य जादूसारखे दिसायचे आणि मग लोक आपली सर्व कामे सोडून त्याच्याकडे बघायचे.



मग हंप्रीने असं काही केलं जे कधी व्हेलने कधी केलं नव्हतं. परत समुद्रात पोहण्या ऐवेजी तो परत सैक्रामेंटो नदीत परत पोहू लागला.

जसजसा हंप्री नदीत वरच्या बाजूला पुढे पोहत गेली. जसजशी नदी छोटी होत गेली.

खरं तर तो समुद्र शोधत होता, पण हे नक्की की हंप्री हरवला होता.



नदीत हंप्रीला पाहण्यासाठी शेकडो लोक आले होते. ते पाण्याकडे टक लावून पाहत राहिले. तो श्वास घेण्यासाठी वर येण्याची ते वाट पाहत होते. मग एका प्रचं फुत्कारासहित त्याची प्रचंड पाठ दिसू लागली. मग प्रत्येकजण ओरडू लागला. "तो आहे!" ते एक विलक्षण दृश्य होते. पण काहीतरी भयंकर चुकत होतं. व्हेलने नद्यांच्या गोड्या पाण्यात नव्हे तर समुद्राच्या खाऱ्या पाण्यात राहावे. जर व्हेल जास्त काळ ताज्या पाण्यात राहिला तर तो मरतो. हंप्री मोठ्या संकटात सापडला होता.

प्रत्येकाला माहित होते की हंप्रीला समुद्रात परत जावे लागेल, परंतु ते कसे करावे हे कोणालाही माहिती नव्हते. कारण लोकांना त्याचा पूर्वीचा अनुभव नव्हता.

हंप्री जितका पुढे गेला, तितकेच सर्वजण चिंतेत पडले... त्याला काही खायला मिळत आहे की नाही... तो  आजारी आहे की नाही... किंवा ती नदीत बुडणार आहे का? एके दिवशी हंप्री एका छोट्या पुलाखाली गेला. हा पूल इतका छोटा होता की हंप्रीने तो कसा ओलांडला हे कोणालाच समजले नाही. आता हंप्री खरोखरच अडचणीत आला होता. तो वाईटरित्या अडकला होता.



पुलाच्या पलीकडे नदी निमुळती होत गेली होती. नदी एवढी छोटी होती की त्यात त्याला फिरणे अशक्य होते. तिथे एक मोठा व्हेल शेतातून गेलेल्या एका छोट्या नाल्यात अडकली होती. यावर विश्वास ठेवणे अवघड होते.

तिथून त्याला लवकरात लवकर बाहेर काढण्यासाठी काही करणे गरजेचे होते. हंप्री आजारी वाटत होता. वैज्ञानिकांना माहीत होते की तो परत समुद्रात गेला नाही तर मरून जाईल. वेळ वेगाने पुढे जात होता.



हंप्रीला वाचवणाऱ्या लोकांना वेगाने पुढे जाणे आवश्यक होते. वैज्ञानिक, तट रक्षक अधिकारी आणि अनेक लोक त्याला वाचवण्याच्या योजनेत सहभागी झाले. त्यांनी त्यांनी पाण्याच्या खाली असणाऱ्या पाईपाना एकमेकावर आपटून जोरात आवाज केला. त्या आवाजाने घाबरून त्याने नदीत परत न जाण्याचा निर्णय घेतला.





त्याबरोबरच त्यांनी एक रेकॉर्डिंग वाजवले ज्यात पाण्याच्या खाली व्हेलच्या खाण्याचा आवाज प्रसारित केला. कदाचित हंप्री एवढा भुकेला होता की त्या आवाजामुळे तो आवाजाकडे जाऊ लागला.



त्याने काम झाले! त्यामुळे हंप्रीने परत
नदीत पोहणे सुरु केले. त्यामुळे त्याची सुटका
झाली... पण धोका टळलेला नव्हता.



लोक पाईप वाजवत राहिले. हंप्री घाबरला.
आता तो काय करेल?



जेव्हा हंप्री छोट्या पुलावर पोहचला तेव्हा तो तिथे थांबला.
तो पुलाच्या खाली जायला घाबरत होता. त्याला एवढी
मोठी जागा सापडत नव्हती ज्यातून तो जाऊ शकेल.



जेव्हा पाइप वाजू लागले तेव्हा हंप्रीला त्याचा राग आला. तो इकडे तिकडे वळला
आणि त्याने आपली मोठी शेपटी हलवली. मग लोकांनी पाईप वाजवणे बंद केले.

पण हंप्रीच्या मित्रांनी हार मानली नाही. त्यांना माहीत होते की त्याला छोटा पूल पार करावाच लागेल. जर त्याने असे केले नाही तर तो नदीत मरून जाईल.

हंप्रीला वाचवण्याचा प्रयत्न करणाऱ्या लोकांनी पुलाच्या खालची जागा मोठी करण्याचा विचार केला. त्यांनी क्रेन मागवला आणि रात्रभर काम करून साचलेला मलबा हटवला.



हंप्रीला ते कळले का?

दुसऱ्या दिवशी लोकांनी परत पाईप बडवायला सुरुवात केली. खट-खट! खट-खट! बोटी हंप्रीच्या जवळ आल्या ज्याने हंप्रीला पुलाकडे जावे वाटेल. कारण ती शेवटची संधी होती, प्रत्येकजण घाबरलेला दिसत होता.





हंप्री धाडसाने पुलाजवळ पोहचल, पण त्याने खाली पोहण्याचा प्रयत्न केला तेव्हा त्याचे डोके पुलाच्या खांबावर आपटले, ते पुलाच्या दोन खांबात अडकले. त्याने स्वतःला वाचवण्यासाठी आपले डोके वरखाली हलवले आणि आपली शेपटी जोरजोरात हलवली.

तो सगळ्यांसाठी एक भयानक क्षण होता. हंप्रीला वाचवण्याचा प्रयत्न करणाऱ्या लोकांना वाटले की आता हंप्रीचे काही खरे नाही. हंप्री अडकला.





पण अचानक हंप्रीने आपला एक मीन-पंख पाण्याच्या बाहेर काढला, जो जवळपास पुलाला स्पर्श करत होता. जसे त्याने आपले शरीर फिरवले, तो मलब्यातून मुक्त झाला आणि पुलाच्या दुसऱ्या बाजूला पोहत गेला.

नदीच्या किनाऱ्यावरील लोकांचा जोरात आवाज आला. मग प्रत्येकजण त्याचा जयजयकार करू लागला. “हंप्रीचा जयजयकार असो!” त्यांचे अभियान यशस्वी झाले. हरवलेला हंप्री शेवटी त्याच्या घराच्या रस्त्यावर होता.



बोटीचा एक पूर्ण समूह आणि त्यांच्या मागे पाईपाचा आवाज यामुळे हंप्रीला आपला रस्ता शोधण्यास मदत मिळाली. शेवटी हंप्री सन फ्रान्सिस्को खाडीत पोहचला.





हंप्रीने खाडीच्या चारी बाजूला आनंदाने पोहत एक पूर्ण दिवस घालवला. त्याने किनाऱ्यावर एकत्र झालेल्या लोकांना काही करामती करून दाखवल्या. म्हणजे लोक त्याला शेवटचे बघू शकतील. जेव्हा त्याने आपली शेपटी पाण्यात थपथपवली तेव्हा लोकांनी वाहवा केली. जेव्हा त्याने हवेत उडी मारली आणि पोटावर पाण्यात पडला तेव्हा लोकांनी परत व्वा! व्वा! केले.

हंप्रीने आपल्या सर्व मित्रांचा निरोप घेतला आणि धन्यवाद म्हटले. ज्यांनी त्याचा जीव वाचवण्यास मदत केली.



ज्या लोकांनी हंप्रीला वाचवण्यास मदत केली त्यांनाही कृतज्ञता वाटली. हंप्रीने त्याला हंपबॅक व्हेलबद्दल बरेच काही शिकवले. तो त्यांचा चांगला मित्र झाला. त्याच्या कठीण त्याची चांगली मैत्रीणही झाली. त्याच्या परीक्षेदरम्यान, हंप्री अनेक वेळा शेपूट हलवून त्याला मदत करण्याचा प्रयत्न करणाऱ्या लोकांना घेऊन जाणाऱ्या बोटी उलटवण्यात यशस्वी झाला. पण त्याने असे कधीच केले नाही. असे वाटले की तिला वाटले की ते तिचे मित्र आहेत. अखेरीस, दुपारच्या उशिरा धुक्यात, हम्फ्रे गोल्डन गेट ब्रिजखाली पुन्हा समुद्रात पोहत गेला. हम्फ्रे व्हेलने आपले ध्येय साध्य केले. शेवटी तो त्याच्या घरी पोहोचला.

## हंप्रीच्या बाबतच्या नोंदी

१० ऑक्टोबर 1985 रोजी हम्फ्रे द हंपबॅक व्हेल पहिल्यांदा सॅन फ्रान्सिस्को खाडीत दाखल झाली. 26 दिवसांपर्यंत, या 45-फूट लांब, 40-टन बेहेमथने सर्वत्र लोकांच्या हृदयावर कब्जा केला कारण तिने पॅसिफिक महासागरात परत जाण्याचा प्रयत्न केला.1985 मध्ये हम्फ्रेची सुटका झाल्यानंतर, ती तिच्या वार्षिक स्थलांतरादरम्यान बे एरियाला भेट देत राहिली.

तो १९८६ मध्ये फॅरलॉन बेटांजवळ आणि पुन्हा १९८८ मध्ये बोडेगा खाडीच्या आत दिसली. शास्त्रज्ञांना त्याच्या पृष्ठीय पंख आणि शेपटीच्या पंखांवरील विशिष्ट चिन्हांद्वारे ते ओळखण्यात सक्षम होते. त्यानंतर 22 ऑक्टोबर 1990 रोजी सकाळी लोकांना सॅन फ्रान्सिस्को खाडीतील कँडलस्टिक पार्कजवळ उथळ पाण्यात चिखलात एक हंपबॅक व्हेल दिसली. त्या दिवशी, शास्त्रज्ञांनी पुष्टी केली की त्यांचा जुना मित्र हम्फ्रे पुन्हा संकटात सापडला आहे. तीन दिवस, मरीन मॅमल सेंटर आणि यूएस कोस्ट गार्डच्या बचाव पथकांनी हम्फ्रेला चिखलातून मुक्त करण्याचा प्रयत्न केला. शेवटी, दुस-या दिवशी, त्यांनी तिला भरतीच्या वेळी बाहेर काढले आणि तिला खोल पाण्यात खेचले. हॅम्फ्रेने गोल्डन गेट ब्रिजखाली पॅसिफिक महासागरात जाण्यापूर्वी सॅन फ्रान्सिस्को खाडीमध्ये पोहण्यात आणखी एक दिवस घालवला... तो पुन्हा एकदा मुक्त झाला..







फोटो: मरीन मैमल सेंटर द्वारा प्रदान केले आहे. ज्यांनी १९८५ आणि १९९० मध्ये हंप्रीला वाचवण्याचा प्रयत्न केला होता.



SHAG SLOUGH
SACRAMENTO RIVER
SUISUN BAY
BENICIA
VALLEJO
MARTINEZ
SAN PABLO BAY
NOVATO
RICHMOND
RICHMOND-SAN RAFAEL BRIDGE
SAN RAFAEL
BERKELEY
OAKLAND
MILL VALLEY
SAUSALITO
BAY BRIDGE
GOLDEN GATE BRIDGE
SAN FRANCISCO
SAN LEANDRO
SAN BRUNO
AN FRANCISCO BAY
HAYWARD
SAN MATEO BRIDGE
PACIFICA
FREMONT
BURLIN
SAN MATEO
FARALLON ISLANDS
PACIFIC OCEAN
DUMBARTON BRIDGE
REDWOOD CITY
SAN JOSE
HALF MO BAY

